**बकरी ईदच्या दिवशी राज्यात जनावरांची अवैध हत्या/हालचाल झाल्यास त्याविरुद्ध पोलीसांनी करावयाची कारवाई.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : डिआयएस ०९१४/प्र.क्र.२३३/विशा १ (ब)**

जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई ४०० ००५

दिनांक :- १ ऑक्टोबर, २०१४

**वाचा :-** परिपत्रक क्रमांक डिआयएस ०९१३/प्र.क्र.४३४/विशा १ ब, दिनांक १४ ऑक्टोबर, २०१३.

**परिपत्रक -**

राज्यात यावर्षी दिनांक ०६.१०.२०१४ रोजी बकरी ईद साजरी केली जाणार आहे. बकरी ईदच्या दिवशी राज्यात जनावरांच्या होणाऱ्या अवैध हत्या / हालचालीसंदर्भात पुढील सूचना विचारात घ्याव्यात :-

(अ) महाराष्ट्र प्राणी संरक्षण कायदा, १९७६ मधील कलम-५ नुसार राज्यात गोहत्येस पूर्णतः बंदी आहे. त्यामुळे गाईची कत्तल करण्यात येऊ नये.

(ब) उपरोक्त कायद्याच्या कलम ६ अनुसार कोणत्याही वासरांची कत्तल करण्यात येऊ नये.

(क) एक वर्षावरील कोणत्याही गोवंशीय नराची कत्तल उपरोक्त कायद्याच्या कलम ६ नुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पात्रतेच्या प्रमाणपत्राशिवाय करण्यात येऊ नये.

या बाबी विचारात घेऊन राज्यात जनावरांची अवैध हत्या होणार नाही, याबाबत सर्व पोलीस यंत्रणेने व जिल्हाधिकारी यांनी खात्री करावी व योग्य ती काळजी घ्यावी.

२. बकरी ईदच्या वेळी पशुवधगृहांमध्ये बेकायदेशीररीत्या जनावरांची कत्तल होऊ नये यासाठी त्या ठिकाणी पुरेसा पोलीस बंदोबस्त ठेवण्यात यावा. तसेच महानगरपालिका क्षेत्रात पशुवधगृहाशिवाय अन्यत्र खाजगी किंवा सार्वजनिक ठिकाणी, घरोघरी, गल्ली-मोहल्ला इत्यादी ठिकाणी जनावरांची कत्तल होऊ नये यासंबंधाने आवश्यक ती खबरदारी पोलीसांनी घ्यावी.

३. बकरी ईदच्या वेळी जनावरांची अवैधरित्या होणारी कत्तल टाळण्याच्या दृष्टीने सर्व जिल्ह्याच्या ठिकाणी संबंधित पोलीस अधिक्षकांनी संबंधित परिवहन अधिकारी, पशुसंवर्धन अधिकारी, नगरपालिकेचे मुख्य प्रशासकीय अधिकारी यांची बैठक घ्यावी. या बैठकीमध्ये अवैधरित्या होणारी जनावरांची कत्तल टाळण्याच्या दृष्टीने घ्यावयाच्या दक्षतेबाबत मार्गदर्शन करण्यात यावे.

४. बकरी ईदच्या वेळी गोवंशहत्या प्रतिबंध कायदा असणाऱ्या परराज्यातून मोठ्या प्रमाणात जनावरांची या राज्यात वाहतूक केली जाते. त्या अगोदर जनावरांना जाणीवपूर्वक अपंग करण्याचे प्रकारसुद्धा घडतात. यासाठी वाहतूक करणाऱ्या वाहनांमधील जनावरांची तज्ज्ञांकडून तपासणी करण्यात यावी. त्यावेळी जनावरांना मुद्दाम अपंग केल्याचे वा जनावरांची वाहतूक अवैध कत्तलीसाठी होत आहे असे लक्षात आल्यास संबंधितांवर कायद्यानुसार तात्काळ कारवाई करण्यात यावी. अटकाव केलेली जनावरे संबंधित इसमाच्या ताब्यात लागलीच न देता पुढील किमान ८ दिवस जवळच्या स्वयंसेवी संस्थांनी चालविलेल्या गोशाळा/पांजरपोळ किंवा पशुसंवर्धन गृहात ठेवण्याची व त्यांच्या चारा-पाण्याची व्यवस्था करण्यात यावी. सीमावर्ती चेक नाक्याच्या ठिकाणी पोलीसांनी याबाबत विशेष दक्षता घ्यावी. तसेच मुंबईमध्ये प्रवेश करण्यासाठीचे जे तपासणी नाके आहेत त्या ठिकाणी वरील बाबींच्या दृष्टीने विशेष खबरदारी घेण्यात यावी.

५. उपरोक्त प्रसंगी राज्यातील शांतता तसेच कायदा व सुव्यवस्था अबाधित राहील, तसेच कोठेही जातीय तणाव निर्माण होणार नाही याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्यात यावी.

६. वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४१००११६३७५३०८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: CN = Jayant Baliram Bhoir, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.10.04 11:07:37 +05'30'

( जयंत भोईर )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.न्यायमूर्ती (नि)- श्री.चंद्रशेखर धर्माधिकारी, अध्यक्ष, प्राणी कल्याण संनियंत्रण समिती, १९ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई - ३२.

२) प्रधान सचिव, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.

३) प्रधान सचिव (परिवहन व राज्य उत्पादन शुल्क), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.

४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) सर्व विभागीय आयुक्त.

६) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

७) परिवहन आयुक्त, मुंबई.

८) पोलीस उप महानिरीक्षक (सर्व परिक्षेत्र).

९) सर्व पोलीस आयुक्त.

१०) सर्व जिल्हाधिकारी.

११) सर्व पोलीस अधीक्षक.

१२) सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी.

१३) निमंत्रक, महाराष्ट्र प्राणी कल्याण कायदा संनियंत्रक समिती, १९ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई - ३२.

१४) संग्रहार्थ नस्ती / निवडनस्ती (वि.शा. १ ब).